अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी /
कर्मचारी यांना भत्ते मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : निविआ-२७२२/प्र.क्र.१००/का.१४२१.**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ५ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेतन-१०१३/प्र.क्र.६०४/प्रशासन-१, दि.२६.७.२०१३ व दि.३०.०१.२०१४
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : संकीर्ण-२०१६/प्र.क्र.८८/अर्थ-१, दि.१२.११.२०१८
३) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक : संकीर्ण-२७२२/प्र.क्र.१००/का.१४२१, दि.३१.०३.२०२२
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : संकीर्ण-१०२३/प्र.क्र.१९३/प्रशासन-१, दि.२८.०४.२०२३
५) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक : संकीर्ण-२७२२/प्र.क्र.१००/का.१४२१, दि.२६.७.२०२३

**प्रस्तावना :-**

वित्त विभागातील अर्थसंकल्पिय कामकाजाशी संबंधित जसे की, अर्थसंकल्प कक्ष, अर्थसंकल्पीय भाषण कक्ष, साधनसंपत्ती कक्ष, कराधान कक्ष इत्यादी कक्षामधील अधिकारी/कर्मचारी यांना संदर्भाधीन क्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये भत्ते मंजूर करण्यात आले आहेत. त्यानुसार पदांच्या उतरंडीप्रमाणे मानधनाची ठोक रक्कम वेतनाव्यतिरिक्त दिली जाते. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पातील कार्यक्रमावरील खर्चाचे समन्वयन नियोजन विभागाकडे सोपविण्यात आले आहे. यास्तव संदर्भ क्रमांक-३ अन्वये नियोजन विभागातील अर्थसंकल्प तयार करण्याच्या प्रक्रियेमध्ये समाविष्ट असलेल्या अधिकारी / कर्मचारी यांना भत्ते मंजूर करण्यात आले. तद्नंतर नियोजन विभागातील अर्थसंकल्प तयार करण्याच्या प्रक्रियेमध्ये प्रत्यक्षात समाविष्ट असलेल्या कार्यासनांनाच मानधन देण्याचा निर्णय संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये घेऊन त्यामध्ये सुधारणा करण्यात आली.

२. दरम्यानच्या कालावधीत वित्त विभागाने सदर मानधनाच्या अनुज्ञेय दरामध्ये संदर्भ क्रमांक-४ येथील शासन निर्णय, दिनांक २८.४.२०२३ अन्वये सुधारणा केली आहे. त्याच धर्तीवर नियोजन विभागातील अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना कराव्या लागणाऱ्या जादा कामकाजासाठी देण्यात येणाऱ्या मानधनाच्या दरामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनाने याबाबत आता असा निर्णय घेतला आहे की, नियोजन विभागातील कार्यक्रम प्रभागातील (१) कार्यासन-१४११, १४१२ व १४१४ (२) कार्यासन-१४१६ (विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र ही विकास मंडळे अस्तित्वात नसल्याने, "विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र प्रदेशनिहाय" याबाबतचे प्रकाशन) (३) जिल्हा वार्षिक कार्यक्रमाशी संबंधित कार्यासन-१४८१ आणि (४) विकास क्षेत्र कार्यासने इत्यादी (५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/(नियोजन) यांच्या कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांना कराव्या लागणाऱ्या जादा कामासाठी अनुज्ञेय मानधनाच्या दरात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम | मानधनाचा दर |
|---|---|---|
| १ | सह सचिव/ उप सचिव | रु.४०,०००/- |
| २ | अवर सचिव, सह संचालक | रु.२५,०००/- |
| ३ | अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक | रु.२५,०००/- |
| ४ | कक्ष अधिकारी | रु.२०,०००/- |
| ५ | संशोधन अधिकारी, निवडश्रेणी लघुलेखक, उच्चश्रेणी लघुलेखक | रु.१७,०००/- |
| ६ | सहायक कक्ष अधिकारी/ सहायक संशोधन अधिकारी/ निम्नश्रेणी लघुलेखक | रु.१६,०००/- |
| ७ | लिपिक टंकलेखक | रु.१२,०००/- |
| ८ | वाहनचालक | रु.१०,०००/- |
| ९ | शिपाई, झेरॉक्स ऑपरेटर | रु. ८,०००/- |

२. मानधनाचे सुधारित दर सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पापासून अंमलात येतील.

३. यासाठी ऑक्टोबर ते मार्च या सहा महिन्यांच्या कालावधीत अधिकारी /कर्मचारी यांची उपस्थिती किमान ७५% असणे अनिवार्य आहे. जर उपस्थिती ५०% असेल तर त्यानुसार ५०% रक्कम अनुज्ञेय राहील. उपरोक्त रक्कम ठोक रक्कमेच्या स्वरुपात देण्यात येईल.

४. "सदर अधिकारी / कर्मचारी यांनी आपले काम समाधानकारकपणे पार पाडले आहे" अशा संबंधित कक्षाच्या प्रभारी सह सचिव / उप सचिव यांच्या प्रमाणपत्राच्या अधिन राहून सदर भत्ते मंजूर केले जातील.

५. या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्रमांक - ओ-७,३४५१, सेक्रेटरिएट आर्थिक सेवा, नियोजन विभाग (अनिवार्य) दत्तमत (३४५१०१८२), १३ कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०८०५१५५५५६१५१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.08.05 16:10:21 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (ले.व अ.) व (लेखा परीक्षा), मुंबई-२०
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. सह सचिव / उप सचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अवर सचिव/कक्ष अधिकारी (रोखशाखा), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (व्यय) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती, कार्यासन-१४२१